सन २०२१-२२ साठी महाराष्ट्र राज्य सहकारी परिषद, पुणे या कार्यालयास निधी वितरणाबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक : निधीवि-२०२१/प्र.क्र. ८८/२२-स,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १८ नोव्हेंबर, २०२१.

**संदर्भ:-** १. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१.
२. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२९.०७.२०२१.
३. शासन निर्णय,सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.संकीर्ण-२०२१/प्र.क्र.५८/२२-स, दि.०६.०८.२०२१.
४. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे कार्यालय यांचे पत्र क्र. अंवनि/६-सआ/२०२१-२२/योजना/निधी वितरण/२०२१/३९२, दि.२२.०९.२०२१.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्य सहकारी परिषद, पुणे या कार्यालयाची पुनर्रचना संदर्भ क्र. ३ च्या शासन निर्णयान्वये करण्यात आलेली आहे. त्यानुसार सदर परिषदेवर श्री.विद्याधर वा. अनास्कर यांची अध्यक्ष (राज्यमंत्री दर्जा) म्हणून नियुक्ती करण्यात आलेली आहे. प्रस्तुत कार्यालयाच्या कार्यालयीन कामकाजाच्या दृष्टीने कराव्या लागणाऱ्या खर्चाकरिता सन २०२१-२२ साठी रु.१०.९२ लाख इतकी अर्थसंकल्पीय तरतूद मंजूर आहे. त्याप्रमाणे सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे कार्यालयाने संदर्भ क्र. ४ च्या पत्रान्वये महाराष्ट्र राज्य सहकारी परिषदेस निधी उपलब्ध करुन देण्याचा प्रस्ताव सादर केला होता. सबब, उक्त परिषदेच्या कार्यालयीन कामकाजाचा खर्च भागविण्याकरिता परिषदेस निधी उपलब्ध करुन देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र राज्य सहकारी परिषद, पुणे या कार्यालयाचा कार्यालयीन खर्च भागविण्यासाठी सन २०२१-२२ साठी अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या रु. १०.९२ लाख इतक्या तरतुदीमधून ३०% म्हणजेच रु. ३,२७,६००/- इतका निधी महाराष्ट्र राज्य सहकार परिषदेस या द्वारे उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

२. उपरोक्त बाबीसाठी होणारा खर्च, सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात, मागणी क्र.व्ही-२, मुख्यलेखाशिर्ष २४२५, सहकार, ००-सहकार-१९५-सहकारी संस्थांना अर्थ सहाय्य (०१)(०१) महाराष्ट्र राज्य सहकारी परिषदेला सहाय्य (अनिवार्य), (२४२५ २३९१) , ३१- सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली मंजूर व उपलब्ध असलेल्या आर्थिक तरतुदीमधून भागविण्यात यावा:-

३. या शासन निर्णयान्वये मंजुर करण्यात आलेला निधी रु. ३,२७,६००/- (रुपये तीन लाख सत्तावीस हजार सहाशे फक्त) महाराष्ट्र राज्य सहकारी परिषद, पुणे या कार्यालयास सहकार आयुक्त व निबंधक कार्यालयातील संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्यामार्फत वितरित करण्यात यावी व यासाठी सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य पुणे यांना **नियंत्रक अधिकारी** (सां.क्र.२२०१००१७२०) म्हणून प्राधिकृत करण्यात येत आहे.

४. उक्त निधी खर्च करताना वित्त विभागाच्या अनुक्रमे संदर्भ क्र. १ व संदर्भ क्र. २ च्या शासन निर्णयातील निर्देशांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. तसेच, सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ४७८/व्यय-२, दिनांक ०१.११.२०२१ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२१११९८१८०१११८१०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAJU KALLUJI NARPANDE

Digitally signed by RAJU KALLUJI NARPANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=445c05397d3e5fac583c028b06de2a1fa2b53743e982f5c31c9f3ffb560b0c16, pseudonym=672F50E9794DD2F3940B5C83752F64C53EAD64B9, serialNumber=F8FAA195025519ECCE143F48FE16B8572D279B7779146441B412B267FB25ACD8, cn=RAJU KALLUJI NARPANDE
Date: 2021.11.18 18:02:43 +05'30'

**( राजू नरपांडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य-१, मुंबई,
२. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य-२, नागपूर,
३. महालेखापाल, (लेखापरिक्षण), महाराष्ट्र राज्य-१, मुंबई,
४. महालेखापाल, (लेखापरिक्षण), महाराष्ट्र राज्य-२, नागपूर,
५. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
६. सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य सहकारी परिषद, पुणे,
७. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे,
८. वित्त विभाग (व्यय-२), मंत्रालय, मुंबई,
९. अवर सचिव ( १७-स), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
१०.निवड नस्ती (२२-स).